प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र -
विद्यार्थ्यांची संपादणूक पातळी वाढविणेबाबत
उपाययोजना

# महाराष्ट्र शासन

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.२०/एसएम-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ जानेवारी, २०१७

**वाचा :**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. पीआरई-१०९४/७०४/(दोन)/प्राशि-१ दिनांक १४ नोव्हेंबर, १९९४
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. शिकाना-२०११/प्र.क्र.११२/प्राशि-१ दिनांक २३ डिसेंबर, २०११
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक २० एप्रिल, २०१६
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. एसएसए-२०१६/प्र.क्र.११५/एसडी-१, दिनांक ६ जून २०१६
५) शासन शुध्दीपत्र, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. एसएसए-२०१६/प्र.क्र.११५/एसडी-१, दिनांक १७ नोव्हेंबर, २०१६
६) शासन शुध्दीपत्र, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. एसएसए-२०१६/प्र.क्र.११५/एसडी-१, दिनांक २४ नोव्हेंबर, २०१६
७) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. अंदाज/वेतनेतर अनु./२०१६-१७/२०१/ दिनांक २९ डिसेंबर, २०१६
८) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांचे पत्र क्र. मप्राशिप/खशा/LEP/२०१६-१७/० दिनांक ७ जानेवारी, २०१७

**शासन निर्णय :**

राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांनी संदर्भाधीन दिनांक ७/१/२०१७ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार राज्यातील शासकीय प्राथमिक शाळांना गणित विषयक शैक्षणिक साहित्य संच उपलब्ध करुन देण्यासाठी रुपये १०.०० कोटी (रु.दहा कोटी फक्त) इतका निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. याबाबीसाठी होणारा खर्च “मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ - प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना अर्थसहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने (२२०२ ०१७३), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षाखाली उपलब्ध तरतुदीतून करण्यात यावा. यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना “नियंत्रक अधिकारी” आणि विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांच्या आस्थापनेवरील लेखा अधिकारी यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांच्या आस्थापनेवरील लेखा अधिकारी यांनी "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ - प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना अर्थसहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने (२२०२ ०१७३), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षांतर्गत रु.१०.०० कोटी (रु.दहा कोटी फक्त) इतका निधी कोषागारातून आहरीत करुन राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांच्या खात्यामध्ये जमा करावा.

४. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांनी उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयातील नवीन सुधारित खरेदी नियमावलीतील तरतूदींचे पालन करुन गणित विषयक शैक्षणिक साहित्य उपलब्ध करुन द्यावे.

५. सदर आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला १४९/प.वि. उपविभाग-३, अनुक्रमांक-४ परिच्छेद क्र.२७(२)(ब) नुसार आणि वित्त विभागाच्या क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक २० एप्रिल, २०१६ अन्वये विभागाला प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक २०/४/२०१६ च्या परिपत्रकाच्या मान्यतेच्या अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्ठातील अनु.क्र.९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्रमांक १ ते ८ मधील बाबी या आदेशासाठी लागू नाहीत. सदरचा निधी खर्च करतांना उद्योग विभागाच्या दिनांक १/१२/२०१६ च्या शासन निर्णयाप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी व सदरचा निधी चालू वर्षातच पुर्णपणे खर्च होईल याची दक्षता महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेने घ्यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११७१४०६५५३३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Ganpat Gunjal

Digitally signed by Ramchandra Ganpat Gunjal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=dc74b0493b4979ad0aa76763f873c23fa35ecb44970562d4aa14a832b6357e54, cn=Ramchandra Ganpat Gunjal
Date: 2017.01.17 15:47:09 +05'30'

**(रा. ग. गुंजाळ)**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर

३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
५. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे / मुंबई
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. स्थानिक निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९. उपसचिव (एसडी/एसएम/अर्थसंकल्प), शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. उपसचिव, वित्त / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई
१२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई
१४. लेखाधिकारी, विभागीय शिक्षण उपसंचालक कार्यालय, मुंबई विभाग, मुंबई
१५. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद सर्व
१६. वित्त विभाग (व्यय-५ / अर्थसंकल्प -८), मंत्रालय, मुंबई
१७. निवडनस्ती, (एसएम-४/एसडी-१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई